**कौशल्य विकास,रोजगार व उद्योजकता संचालनालय व अधिनस्त कार्यालयासाठी संगणक यंत्रणा खरेदी करण्याबाबत झालेल्या खर्चास मान्यता देणे**

**महाराष्ट्र शासन**
**कौशल्य विकास व उदयोजकता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः कौविउ-२०१५/प्र.क्र.२६९/रोस्वरो-१**
२ रा मजला, मंत्रालय, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०० ०३२
तारीख: १९/११/२०१६

वाचा -

१) शासन निर्णय क्रमांकः कौशल्य विकास व उद्योजकता विभाग क्र.कौविउ-२०१५/प्र.क्र.२६९/रोस्वरो-१ दि.३०.१०.२०१५
२) आयुक्त, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता संचालनालय यांचे पत्र क्र.कौविरोवउसं-७/संगणक/२२६/३८५९ दि.२० एप्रिल,२०१६
३) आयुक्त, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता संचालनालय यांचे पत्र क्र.कौविरोवउसं-७/संगणक/२२६/७५२१ दि.१० मे,२०१६
४) आयुक्त, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता संचालनालय यांचे पत्र क्र. कौविउ २०१५/प्र.क्र.२८३/रोस्वरो-१,दि.३० जून,२०१६.
५) आयुक्त, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता संचालनालय यांचे पत्र क्र.कौविरोवउसं-७/संगणक/२२६/१२१३४ दि.१९ ऑगस्ट,२०१६.
६) आयुक्त, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता संचालनालय यांचे पत्र क्र. कौविरोवउसं-७/संगणक/२२६/१६४७० दि.१९ ऑक्टोबर,२०१६.

**शासन निर्णय-**

प्रस्तावना:- कौशल्य विकास व उद्योजकता विभागाच्या दि.१४ सप्टेंबर,२०१५ रोजी पार पडलेल्या प्रकल्प अंमलबजावणी समितीच्या बैठकीत दिलेल्या मान्यतेस अनुलक्षून कौशल्य विकास ,रोजगार व उदयोजकता संचालनालय व त्यांच्या अधिनस्त कार्यालयासाठी सन २००९-१० मध्ये खरेदी करण्यात आलेल्या संगणक यंत्रणेच्या बदल्यात नवीन यंत्रणा खरेदी करण्यासाठी येणा-या खर्चास उपरोक्त संदर्भाधिन क्र. १ येथील शासन निर्णय दि.३०.१०.२०१५ अन्वये प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्यात आली. सदर मान्यता ही सन २०१५-२०१६ या आर्थिक वर्षापुरती होती. सदर मान्यतेस अनुलक्षून संबंधित पुरवठादारांना सदर संगणक यंत्रणेचा पुरवठा करण्याचे खरेदी आदेश कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता संचालनालयामार्फत देण्यात आले. परंतु, सदर पुरवठादारांनी विहीत कालमर्यादेत याबाबतची देयके सादर न केल्याने तसेच देयके सादर केल्यावर संचालनालयाकडे देयके मंजूर करण्यासाठी पुरेसा निधी उपलब्ध नसल्याने संचालनालयाद्वारे सदर देयकांचे प्रदान सन २०१५-२०१६ या आर्थिक वर्षात संबंधितांस करणे शक्य झालेले नाही. सबब, आयुक्त, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता संचालनालय यांनी उपरोक्त संदर्भ क्र. २ येथील दि.२० एप्रिल,२०१६ च्या पत्रान्वये सदर देयकाबाबत अदा करावयाच्या रक्कमेस पुनश्च: सन २०१६-१७ चा आर्थिक वर्षातील मंजूर अनुदानातून प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याची विनंती शासनास केली. आयुक्त, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता संचालनालय यांच्या प्रस्तावावर शासनाने उपस्थित केलेल्या मुद्दांबाबत संचालनालयाने उक्त संदर्भ क्र.३,४,५,व६ येथे नमूद केलेल्या पत्राद्वारे सादर केलेल्या माहितीस अनुलक्षून संचालनालयासाठी वरील प्रमाणे खरेदी केलेल्या संगणक यंत्रणेच्या खरेदी साठी आलेल्या खर्चाचा प्रस्ताव पुनश्च: सन २०१६-१७ या आर्थिक वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यासाठी प्रशासकीय मंजुरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

२. दि.१४ सप्टेंबर,२०१५ रोजी पार पडलेल्या विभागाच्या प्रकल्प अंमलबजावणी समितीच्या बैठकीत देण्यात आलेल्या मान्यतेस अनुलक्षून कौशल्य विकास, रोजगार व उदयोजकता संचालनालय व त्यांच्या अधिनस्त कार्यालये यांच्यासाठी खरेदी करण्यात आलेल्या संगणक व त्यासंबंधातील यंत्रणेच्या देयकापोटी खालील रक्कम प्रदान करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | खरेदी करण्यात येणारी यंत्रणा | खरेदी करण्यात आलेले नग | प्रदान करावयाची रक्कम (रुपये) |
|---|---|---|---|
| (अ) | (ब) | (ड) | (ड)X(इ) |
| १. | ऑल इन वेन डेस्कटॉप संगणक | ३५ | १६,३५,३७५/- |
| २. | लेझर प्रिंटर्स | ४१ | २,९२,३५३/- |
| ३. | १० केव्हीए युपीएस (बॅकअप टाईम १२० मिनिटे) | १ | २,१२,३८०/- |
| ४. | ५ केव्हीए युपीएस (बँकअप टाईम १२० मिनिटे) | १२ | १४,३१,३०४/- |
| | एकूण (रु. पस्तीस लाख एकाहत्तर हजार चारशे बारा फक्त) | | ३५,७१,४१२/- |

३. वित्त विभाग, शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम,भाग-२ दि.१७ एप्रिल,२०१५ प्रमाणे वित्तीय नियमपुस्तिका, १९७८ भाग-पहिला, उप विभाग दोन, अ.क्र.२७(अ), नियम क्रमांक ७६ नुसार प्रशासकीय विभागास असलेल्या अधिकारास अनुलक्षून व खालील अटीच्या अधिन राहून सदर मान्यता देण्यात येत आहे. :-

१) उपरोक्त यंत्र सामुग्री निश्चित केलेल्या विनिर्दीष्टाप्रमाणे असल्याची खातरजमा केल्याखेरीज तसेच यंत्रांच्या गुणवत्तेची खात्री पटल्याखेरीज कंपनीस रक्कम प्रदान करण्यात येऊ नये.
२) सदर यंत्रणेची नोंद संबंधित कार्यालयाच्या जडवस्तू संग्रह नोंदवहीत घेण्यात यावी.
३) उपरोक्त यंत्रणेची खरेदी ही उपलब्ध निधीच्या मर्यादेत करण्यात यावी.

४. सदर खर्च लेखाशीर्ष मागणी क्र.झेडए-०१, प्रधान लेखाशीर्ष-२२३०-कामगार व सेवायोजन,०२-सेवायोजना सेवा, ००१ संचालन व प्रशासन, (०२)(०१) सेवायोजन कार्यालयात संगणित्राची पध्दती सरु करणे,१३ कार्यालयीन खर्च( योजनांतर्गत) अंतर्गत वित्तीय वर्ष २०१६-२०१७ मध्ये मंजूर करण्यात आलेल्या अर्थसंकल्पीय तरतूदीतून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१६१११९१६२०३६२८०३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Samridhi V Angolkar

Digitally signed by Samridhi V Angolkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Samridhi V Angolkar
Date: 2016.11.19 16:23:06 +05'30'

(समृध्दी वि.अनगोळकर)
अवर सचिव

**प्रत,**

१. महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र १/२,मुंबई/नागपूर

२. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
३. उप कोषागार अधिकारी, कोकण भवन, नवी मुंबई
४. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
५. आयुक्त, कौशल्य विकास, रोजगार व उदयोजकता संचालनालय, कोकणभवन,नवी मुंबई
६. प्रधान सचिव, कौशल्य विकास व उदयोजकता विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
७. वित्त विभाग, व्यय-१५, मंत्रालय, मुंबई
८. नियोजन विभाग, का-१४७१, मंत्रालय, मुंबई
९. कक्ष अधिकारी ( रोस्वरो-२) ,कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, मंत्रालय, मुंबई-०१
१०. निवड नस्ती (रोस्वरो-१)